**जल व भूमी व्यवस्थापन संस्थेतील कर्मचा-यांना सुधारीत वेतनसंरचना लागू करण्याविषयी.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- वाल्मी १००९/(१०६/०९) लाक्षेवि(आस्था)**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दिनांक- १८/१२/२००९**

**वाचा :- १**) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.वेपूर-१२०८/प्र.क्र.७२/सेवा-९, दि. ६ ऑक्टोबर, २००८

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.वेपूर-१२०९/प्र.क्र.२०/सेवा-९, दि. २७/२/०९

३) शासन अधिसूचना, वित्त विभाग क्र.वेपूर-१२०९/प्र.क्र.२७/सेवा-९, दि. २२/४/०९

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.वेपूर-१२०९/प्र.क्र.६९/सेवा-९, दि. २९/४/०९

**प्रस्तावना :-**

सहाव्या केन्द्रीय वेतन आयोगाच्या शिफारशीवरील केन्द्र शासनाचे निर्णय विचारात घेऊन राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचा-यांच्या वेतनश्रेणीत सुधारणा करण्याकरिता श्री. पी. एम. ए. हकीम, सेवानिवृत्त सचिव, केन्द्र शासन यांच्या अध्यक्षतेखाली राज्य वेतन सुधारणा समिती, २००८ गठीत करण्यात आली होती. सदर समितीच्या शिफारशी शासनाने काही फेरफारांसह संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये स्विकृत केल्या आहेत. तसेच प्रारंभिक वेतन निश्चितीबाबतची सविस्तर कार्यपध्दती संदर्भ क्र.३ येथील परिपत्रकान्वये विहित करण्यात आलेली आहे. या आधारे १०० टक्के शासन अनुदानित जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद या संस्थेतील शिक्षकेतर अधिकारी/कर्मचा-यांना सुधारित वेतन संरचना लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

शासन असे आदेश देत आहे की, जल व भूमी व्यवस्थापन संस्थेतील कर्मचा-यांना दिनांक १ जानेवारी, २००६ पासून सोबतच्या प्रपत्रात विहित केल्यानुसार सुधारित वेतन संरचना लागू करण्यात यावी. संदर्भाधीन ३ व ४ येथील आदेशातील तरतुदीनुसार संबंधीत कर्मचा-यांची यथास्थिती दिनांक १ जानेवारी, २००६ अथवा विकल्पाच्या दिनांकापासून काल्पनिकरित्या वेतननिश्चिती करण्यात यावी. सुधारित वेतननिश्चितीच्या अनुषंगाने सुधारित वेतनाचे प्रत्यक्ष लाभ दिनांक १ एप्रिल, २००९ पासून देण्यात यावे. दिनांक १ जानेवारी, २००६ ते दिनांक ३१ मार्च, २००९ या कालावधीतील सुधारित वेतनाची कोणतीही थकबाकी अनुज्ञेय असणार नाही.

तसेच, संदर्भाधीन १ येथील आदेशान्वये मंजूर केलेल्या अग्रिमाची रक्कम दिनांक १ एप्रिल, २००९ पासून देय सुधारित वेतनाच्या थकबाकीच्या रकमेतून एकरकमी वसुल करण्यात यावी.

सुधारित वेतनसंरचनेत वेतननिश्चिती करण्यासाठी आवश्यक तो विकल्प सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून **दोन महिन्याच्या** आत देण्यात यावा. एकदा दिलेला विकल्प **अंतीम** राहील.

या आदेशान्वये लागू करण्यात आलेल्या सुधारित संरचनेमुळे होणारा अतिरिक्त खर्च संस्थेतील शिक्षकेतर अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात येतो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व तो संस्थेला मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६१३/सेवा-९, दि.४/१२/२००९ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra . gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २००९१२१८१७०५३६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( अ. रा. अरगडे )
शासनाचे अवर सचिव.

प्रति,

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. मंत्री, जलसंपदा विभाग (कृष्णा खोरे वगळून ) मंत्रालय, मुंबई,
सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद
महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट राज्य, मुंबई/नागपूर
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
वित्त विभाग ( सेवा-९) मंत्रालय, मुंबई
आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लाक्षेवि (आस्था) संग्रहार्थ